**विक्रीकर विभागाच्या पुनर्रचने अंतर्गत मुंबई विक्रीकर कायद्यासाठीच्या मंजूर २६४ पदांना मुदतवाढ देण्याबाबत.**

**महाराष्ट्र शासन**
**वित्त विभाग,**
**शासन निर्णय, क्रमांक विकवि-१२१६/प्र.क्र.१५८/वि.प्र.४,**
मादाम कामा मार्ग, हुतात्मा राजगुरु चौक,
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
दिनांक :- २८ फेब्रुवारी २०१७.

**वाचा :-** (१) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि-१२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४, दि.१८.११.२०११
(२) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि-१२१४/प्र.क्र.४१८/वि.प्र.४, दि.१४.०१.२०१५
(३) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि-१२१५/प्र.क्र.२२४/वि.प्र.४, दि.८.७.२०१५
(४) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि-१२१६/प्र.क्र.१५८/वि.प्र.४, दि. २८.०७.२०१६.
(५) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक विकवि-१२१६/प्र.क्र.१५८/वि.प्र.४, दि. १३.१०.२०१६.
(६) शासन निर्णय, वित्त विभाग, क्रमांक पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि. १०.०२.२०१७.

**प्रस्तावना :-**

विक्रीकर विभागाच्या शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विकवि-१२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४, दि.१८.११.२०११ अन्वये मुंबई विक्रीकर कायद्याअंतर्गत २६४ पदांना दि.३१.१२.२०१४ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. त्यानंतर वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विकवि-१२१४/ प्र.क्र.४१८/वि.प्र.४, दि.१४.०१.२०१५ अन्वये सदर पदांना दि.३०.०६.२०१५ पर्यंत, तसेच, वित्त विभाग, शासन निर्णय, क्र.विकवि-१२१५/प्र.क्र.२२४/ वि.प्र.४, दि. ०८.०७.२०१५ अन्वये सदर पदांना दि.३०.०६.२०१६ पर्यंत, तसेच संदर्भाधिन क्र. ४ चा शासन निर्णय, दि. २८.०७.२०१६ अन्वये सदर पदांना दि. ३०.०९.२०१६ पर्यंत, तसेच संदर्भाधिन क्र. ५ चा शासन निर्णय, दि. १३.१०.२०१६ अन्वये सदर पदांना दि. २८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. मुंबई विक्रीकर कायद्यांतर्गत प्रलंबित वसूली व अनुषांगिक कामे यांचा निपटारा करण्यासाठी विक्रीकर विभागास सदर पदांची आवश्यकता असल्याने, या पदांना मुदतवाढ देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :-**

विक्रीकर विभागाच्या शासन निर्णय, वित्त विभाग, क्र.विकवि १२११/प्र.क्र.२९१/वि.प्र.४, दि.१८.११.२०११ अन्वये विक्रीकर विभागाच्या पुनर्रचनेचा आढावा घेण्यात आलेला आहे. सदर शासन निर्णयातील परिच्छेद क्र.११ मधील तरतूदींस अनुसरुन, मुंबई विक्रीकर कायद्याअंतर्गत २६४ पदांना दि.२८.०२.२०१७ पर्यंत मुदतवाढ देण्यात आलेली आहे. आता सदर पदांना, दि. ३०.०९.२०१७ पर्यंतच्या कालावधीसाठी मुदतवाढ देण्यात येत आहे.

२. यासंदर्भात होणारा खर्च "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०४०, विक्री, व्यापार इत्यादींवरील कर, (००) ००१-संचालन व प्रशासन, (००) (०१) विक्रीकर आयुक्त (२०४० ००४२), ०१ वेतन" व "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०४०, विक्री, व्यापार इत्यादींवरील कर, १०१ वसुली खर्च, (०१) वसुली खर्च, (०१) (०१) विक्रीकर विभाग, (२०४० ००५१) ०१ वेतन" तसेच "मागणी क्र.जी-१, प्रधानशीर्ष २०२०, उत्पन्न व खर्च यावरील करांची वसुली (००) ००१-संचालन व प्रशासन, व्यवसाय, व्यापार आजिविका व नोकऱ्या यांवरील कर (००) (०१) विक्रीकर आयुक्त (२०२० ००२३) ०१ वेतन" या लेखाशीर्षाखाली सन २०१७-१८ या वर्षाकरीता मंजूर करण्यात आलेल्या अनुदानातून भागविण्यात यावा.

३. हे आदेश वित्त विभाग, शासन निर्णय पदनि-२०१६/प्र.क्र.८/१६/आ.पु.क. दि.१०.०२.२०१७ अन्वये प्रशासकीय विभागास प्रदान केलेल्या अधिकारांचा वापर करुन निर्गमित करण्यात येत आहेत.

४. सदर शासन निर्णय, महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या वेबसाईटवर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१७०२२८१२३२३७७४०५ असा आहे. हा शासन निर्णय डिजिटल स्वाक्षरी साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने,

Dattatraya E Ghanavat

Digitally signed by Dattatraya E Ghanavat
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Finance, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e754dcfc3ad39b1f1ee734fb62ca6c0558ffca e55bba934d42bad451952ab66c, cn=Dattatraya E Ghanavat
Date: 2017.02.28 12:35:42 +05'30'

(द.ए.घनवट)
कार्यासन अधिकारी, वित्त विभाग.

**प्रति,**

१. विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
२. महालेखापाल (लेखापरीक्षा) १, महाराष्ट्र, मुंबई,
३. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) १, महाराष्ट्र, मुंबई,
४. महालेखापाल (लेखापरीक्षा) २, महाराष्ट्र, नागपूर,
५. महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता) २, महाराष्ट्र, नागपूर,
६. विशेष विक्रीकर आयुक्त, महाराष्ट्र राज्य, मुंबई,
७. निवासी लेखा परीक्षा अधिकारी, मुंबई,
८. अधिदान व लेखा अधिकारी, मुंबई,
९. सर्व जिल्हा कोषागार अधिकारी,
१०.मा.मंत्री (वित्त) यांचे खाजगी सचिव, मंत्रालय, मुंबई,
११.अपर मुख्य सचिव (वित्त) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१२.प्रधान सचिव (व्यय) यांचे स्वीय सहायक, मंत्रालय, मुंबई,
१३.कार्यासन अधिकारी, प्रशासन-४/वि.प्र.१,२,३,
**१४.निवड नस्ती (विप्र-४)**